**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मातृवंदना योजनेकरीता निधी वितरण.**
**राज्य हिस्सा-२२११ १४४१**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १५ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) वि. वि, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.दि.२७.०५.२०२१ व दि.२७.०९.२०२१.
३) केंद्र शासन, महिला व बाल विकास मंत्रालयाचे पत्र क्र. No.१५/१/२०२०/PMMVY, दि.३१.१२.२०२१.
४) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.प्रमावं- २०२२/प्र.क्र.२०/कु.क.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मातृवंदना योजनेसाठी अनुसूचित जमाती घटकासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता केंद्र शासनाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील आदेशान्वये केंद्र हिस्सा रु.३०२.००१०३ लाख निधी प्राप्त झालेला आहे. त्या अनुषंगाने समरुप राज्य हिस्सा रु.२०१.३३४०२ लाख वितरीत करण्याबाबत सार्वजनिक आरोग्य विभागाकडून सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२११, कुटुंबकल्याण खालील (०२) (०२) प्रधानमंत्री मातृवंदना या योजनेकरीता (२२११ १४४१), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ साठी प्राप्त केंद्र हिश्श्याच्या प्रमाणात समरुप राज्य हिस्सा **रु.२०१.३३४०२ लाख** इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **राज्य हिस्सा व लेखाशिर्ष** | **अर्थसंकल्पीय तरतुद** | **यापुर्वी वितरीत निधी** | **सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी** |
|---|---|---|---|---|
| प्रधानमंत्री मातृवंदना योजना | राज्य हिस्सा (४० टक्के) लेखाशिर्ष-२२११ १४४१ | १५००.०० | ८०५.३३६०८ | २०१.३३४०२ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.२०१.३३४०२ लाख (अक्षरी रुपये दोन कोटी एक लाख तेहतीस हजार चारशे दोन फक्त)** इतका निधी प्रशासकिय विभागप्रमुख म्हणून अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात मात्र फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७९/व्यय-१४, दि.०७.०२.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०७१८२८०७८३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.16 16:26:14 +05'30'

**( रविंद्र औटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग